**अर्थसंकल्पीय अनुदान मागणी क्र. वाय-०६,**
**४४०२ मृद व जलसंधारण यावरील भांडवली खर्च**
**( योजनेतर ) ( ४४०२ ११३९ व ४४०२११४८)**

**महाराष्ट्र शासन**
**पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः बीयुडी-१६१७/प्र.क्र.१११/ पापु-१५**
सातवा मजला, गोकुळदास तेजपाल रुग्णालय इमारत संकुल
लोकमान्य टिळक मार्ग , मुंबई -४०० ००१
तारीखः २६ एप्रिल, २०१७

वाचा -

**शासन परिपत्रक , वित्त विभाग क्रमांकः अर्थसं-२०१७/प्र.क्र.७५/अर्थ-३दिनांक १८.०४.२०१७**

प्रस्तावना -

"महाराष्ट्र विनियोजन विधेयक -२०१७"( महाराष्ट्र विनियोजन ( लेखानुदान) अधिनियम ,२०१७ यांच्या अनुसूचीच्या स्तंभ ४ मध्ये विनिर्दिष्ट करण्यात आलेल्या रकमांसह) यास विधानमंडळाने मंजुरी दिली आहे. सदर विधेयकाचे अधिनियमात रुपांतर झाले असुन ते २०१७ चा महाराष्ट्र अधिनियम क्रमांक -२६ म्हणून महाराष्ट्र राजपत्र असाधारण भाग ४, दि. १५ एप्रिल ,२०१७ यामध्ये प्रसिध्द करण्यात आले असल्याचे उपरोक्त परिपत्रकान्वये कळविण्यात आले आहे . वित्त विभागाच्या संदर्भाधीन दि. १८.०४.२०१७ च्या परिपत्रकान्वये पाणी पुरवठा व स्वच्छता विभागास महाराष्ट्र विनियोजन अधिनियम , २०१७ अनुसार वित्तीय वर्ष २०१७-१८ च्या एकुण अर्थसंकल्पीय योजनांतर्गत व योजनेतर तरतुदींपैकी ८० टक्के निधी सन २०१७-१८ च्या प्रथम नऊ महिन्यांकरिता ( डिसेंबर २०१७ अखेर ) अर्थसंकल्पीय प्रणालीवर उपलब्ध करुन दिला असल्याचे कळविले आहे. तसेच योजनेतर व योजनांतर्गत भांडवली निधी वितरणाची मर्यादा १०० टक्के राहील असे पुढे नमूद करण्यात आले आहे.

२. सन २०१७-१८ या आर्थिक वर्षात भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणेच्या आस्थापनेचा खर्च भागविण्यासाठी "४४०२ मृद व जलसंधारणयावरील भांडवली खर्च " या लेखाशिर्षाखाली रु. २३८०.८४ लाख इतकी दत्तमत्त व रु. ५.०० लाख इतकी भारित तरतूद करण्यात आली आहे. वित्त विभागाच्या संदर्भाधीन परिपत्रकानुसार सदर लेखाशीर्षाखाली वितरीत करण्यात येणारे अनुदान हे भांडवली खर्च असल्याने मंजूर झालेले अर्थसंकल्पीय अनुदान संचालक, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा, पुणे यांना उपलब्ध करुन देण्याची बाब विचाराधीन आहे.

## शासन निर्णय-

सन २०१७-१८ या आर्थिक वर्षात भूजल सर्वेक्षण व विकास यंत्रणेच्या आस्थापना व इतर अनुषंगीक बाबींवरील खर्च भागविण्यासाठी पुढील विवरणपत्रात स्तंभ-४ मध्ये दर्शविल्याप्रमाणे एकूण रु. २३८०.८४ लाख इतकी दत्तमत्त व रु. ५.०० लाख इतके भारित अनुदान संचालक, भूजल सर्वेक्षण व विकास यंत्रणा, पुणे यांना या शासन निर्णयाव्दारे मंजूर व मुक्त करण्यात येत आहे.

( रुपये लाखात)

| अ.क्र | उपशीर्ष | सन २०१७-१८ करिता मंजूर तरतूद | वित्त विभागाने उपलब्ध करुन दिलेले अर्थसंकल्पीय अनुदान |
|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ |
| १ | ०१-वेतन | २०१०.९३ | २०१०.९३ |
| २ | ०२ मजूरी | ३.१५ | ३.१५ |
| ३ | ०३ -अतिकालीक भत्ता | ६.४८ | ६.४८ |
| ४ | ०६ -दुरध्वनी ,वीज देयके | ३४.९७ | ३४.९७ |
| ५ | ११- देशांतर्गत प्रवास खर्च | ४६.९८ | ४६.९८ |
| ६ | १३ -कार्यालयीन खर्च | ३५.११ | ३५.११ |
| ७ | १४- भाडेपट्टी व कर | ३३.०० | ३३.०० |
| ८ | २४- पेट्रोल ,तेल, वंगण | ११४.०० | ११४.०० |
| ९ | २६- जाहिरात व प्रसिध्दी | ०.२५ | ०.२५ |
| १० | ५१ -मोटार वाहने | १८.३० | १८.३० |
| ११ | ५२ -यंत्रसामग्री व साधन सामग्री | ७७.६७ | ७७.६७ |
| | **एकूण दत्तमत** | **२३८०.८४** | **२३८०.८४** |
| | **५० इतर भारित खर्च** | **५.००** | **५.००** |

सदर खर्च मागणी क्र. वाय -६ , " ४४०२ मृद व जल संधारण यावरील भांडवली खर्च (००) १०१ - मृद सर्वेक्षण चाचणी- (०१) (०१) एक भूजल सर्वेक्षण आणि विकास अभिकरण याखालील लहान पाटबंधारे योजना (४४०२ ११३९) दत्तमत व (४४०२ ११४८) भारित " या लेखाशीर्षाखाली दर्शविण्यात यावा . संचालक, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा, पुणे यांनी अर्थसंकल्पीय वितरण प्रणालीवर उपलब्ध करुन दिलेल्या मासिक तरतूदीतून (Monthly Cash Flow) भागविण्यात यावा. सदर निधी वित्त विभागाच्या संदर्भाधीन दि. १८.०४.२०१७ च्या परिपत्रकातील तरतुदींच्या अधीन राहुन वितरीत करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०४२६१६५९१८१४२८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Mahesh Bhagwan Sawant

Digitally signed by Mahesh Bhagwan Sawant
DN: CN = Mahesh Bhagwan Sawant, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Water Supply and Sanitation Department
Date: 2017.04.26 18:14:31 +05'30'

**(महेश सावंत)**

उप सचिव, महाराष्ट्र शासन

प्रत,

१. संचालक, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा, पुणे
२. उपसंचालक, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा, सर्व
३. वरिष्ठ भूवैज्ञानिक, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा, सर्व
४. उप अभियंता ( यां) , भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा, सर्व
५. महालेखापाल, महाराष्ट्र -१ मुंबई /२- नागपूर ( लेखापरिक्षा/ लेखा व अनुज्ञेयता )
६. वित्त विभाग, अर्थसंकल्प १६ ( २ प्रती)
७. कक्ष अधिकारी / लेखा अधिकारी पापु-०४, पापु-२०
८. निवड नस्ती पापु-१५